श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्य भगवान श्रीधरस्वामीमहाराज
लिखित पद्यमय, एकशंएकवीस ओवीबध्द



# श्री मारुती महात्म्य

याचा सुरस सरळ गद्य अनुवाद

# रूद्र महीमा

अनुवादक
श्री. मंजुनाथदास कृष्णराव कामत
बी. ए. (स्पे),बी. ईडी. कोविद, एल.एल.बी
निवृत्त मुख्याध्यापक आणि वकील
मु. नगर्से, काणकोण, गोवा, ४०३७०२
आणि
'हरीकृष्ण' धोबीघाट रस्ता, कारवार, ५८१३०१



डिसेंबर १९९४ मूल्य ५ रुपये

श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्य भगवान श्रीधरस्वामीमहाराज

लिखित पद्यमय, एकशेएकवीस ओवीबध्द



# श्री मारुती महात्म्य

याचा सुरस सरळ गद्य अनुवाद

# रूद्र महीमा

अनुवादक

**श्री. मंजुनाथदास कृष्णराव कामत**

बी. ए. (स्पे),बी. ईडी. कोविद, एल.एल.बी

निवृत्त मुख्याध्यापक आणि वकील

मु. नगर्से, काणकोण, गोवा, ४०३७०२

आणि

'हरीकृष्ण' धोबीघाट रस्ता, कारवार, ५८१३०१

डिसेंबर १९९४ मूल्य ५ रुपये

प्रकाशक
मंजुनाथदास कृष्ण कामत
श्रीकृष्ण, धोबीघाट रोड,
कारवार– ५८१३०१

आवृत्ती – प्रथम

मुद्रक
दीपक गावकर
सागरदीप प्रिंटिंग प्रेस
कारवार – ५८१३०१
दूरध्वनी – २६२२०

---

कै. तिम्मायया नाईक

संस्थापक, श्रीधर स्वामी पीठ

आणि

पद्मावती मंदीर, भटकळ

यांचे स्मृतीस

अर्पण

---



## मनोगत

१९७२ साली माझ्या आयुष्यात असा एक खडतर प्रसंग आला की मला वाटले माझे भविष्य संपले. माझ्या मुख्याध्यापक पदावर असूयेने भलते सलते आरोप करून मला सस्पेंड करण्यात आले. कोर्ट कचेरीची भाषा जरी मी बोललो तरी पण मला दैवी शक्तीवर मोठा विश्वास. अशावेळी भटकळ (उ.का)येथ पदमावती देवी मंदीर व श्रीधरस्वामीपीठ स्थापन केलेल्या अंकोलेचे श्री तिम्मा नाईक स्वामी यांची भेट झाली. त्यानी मला दिलासा दिला. श्रीधरस्वामीजींनी लिहीलेले पद्यमय श्री मारुतिस्तोत्र एकशेएकवीस ओळी मी दर शनीवारी श्रद्धेने वाचू लागलो ते अद्याप चालू आहे. लवकरच माझ्यावरील संकट टळले व मला पूर्ववत् कामावर हजर करण्यात आले. त्या वेळी मी वसा केला स्वामीजींची ही कृती सरळ अनुवाद करुन प्रकट करणार. पण ते कार्य तब्बल बावीस वर्षांनंतर पूर्ण झाले मी माझ्या जीवनांत बरीच प्रगति केली. नौकरी सांभाळून वकीली पदवी मिळविली. श्रीधर स्वामीकृपेने सुखसमाधानानें आहे. माझ्याप्रमाणे इतरांच्या जीवनात सुखसमाधान मिळावे हीच माझी प्रार्थना.

हे पुस्तक तपासून दिल्याबद्दल शिवाजी कॉलेज बाड, कारवार येथील प्रो. अनील मजली यांचा मी ऋणी. अल्पकालात सुंदर छपाई करून दिल्याबदल श्री दीपक गावकर व त्यांचे सहकारी श्री घनशाम राणे व कु. रंजना गुरव यांचे मी आभार मानतो. जाहिरातदाराना मी कृतज्ञ आहे.

२१-१०-१९९४ रंजनाथदास कामत




## आशीर्वाद प्रस्तावना

जग आज खूप पुढे गेले आहे. तरीही सर्व सुख सुविधांचा लाभ होऊनही असंख्य माणसं संसारतापाने पोळलेली दिसतात आणि तहानलेल्याने तृषाशमनार्थ इतरत्र भटकावे तशा ह्या असंख्य व्यक्ती परमेश्वराची प्रार्थना,उपासना वगैरे करताना दिसतात. परमेश्वरा शिवाय आपले दु:ख हरण करणारा अन्य कोणीही नाही अशी श्रद्धा निर्माण झाली म्हणजे त्या व्यक्तीची प्रार्थना फलद्रूप होते, यात शंका नाही. भगवान रमणमहर्षी यांच्या मताप्रमाणे परमात्म्याची कृपा ही निरंतर आहेच ज्याप्रमाणे सूर्यप्रकाश सर्वत्र आहे त्याप्रमाणे भगवंताची कृपा सर्वत्र आहे.फक्त ती आत्मसात करणे मात्र मानवाच्या हाती आहे. ' न मे द्वेष्योस्ति नच प्रिया:' असे वचन आहे.

भारतीय लोकांच्या विशेषेकरुन हिंदू लोकांच्या जीवनात संताना फार मोठे स्थान आहे ते याचकरिता. जे संत स्वत: ईश्वर कृपेचा आगळा सोहळा अनुभवून इतराना त्या दिव्यमार्गाकडे जाण्यास प्रेरित करतात. विशेषत: ज्या ज्या वेळी भारत देशावर परकीयांची आक्रमणे झाली. तेव्हा लोकांचे नैतिक धैर्य टिकवून ठेवण्याचे महान कार्य संतानी केले. अशा असंख्य श्रेष्ठ संतांमध्ये समर्थ रामदास स्वामीचे महत्व अनन्यसाधारण आहे. प्रस्तुतच्या छोटेखानी पुस्तकाचे वर्ण्यनायक श्रीधर स्वामी यांचे वास्तव्य समर्थ रामदासांच्या वास्तव्याने पुनीत झालेल्या सज्जन गडावर झाले असल्याने ते समर्थाच्या परंपरेतील ठरतात हे येथे विशद करुन सांगण्याची आवश्यकता नाही. मात्र एक गोष्ट या ठिकाणी नमूद

केली पाहिजे ती ही की श्रीधर स्वामीचे वास्तव्य जरी महाराष्ट्रात सज्जन गडावर झाले असले तरी त्यांच्या कार्याचे मुख्य क्षेत्र दक्षिण भारत हेच आहे. त्यामुळे की कोण जाणे त्यांची माहिती महाराष्ट्राला विशेष झाली नसावी ही गोष्ट लक्षात घेऊन प्रस्तुतच्या पुस्तकाचे कर्ते श्री मंजुनाथ कामत (वकील) यानी श्रीधर स्वामीच्या चरित्राचे ठळक विशेष देऊन मुख्य भर त्यांच्या कार्याच्या आणि अध्यात्मिक काव्याच्या परिचयावर दिला आहे.

श्रीधर स्वामीनी गड सोडल्यानंतर दक्षिणेस पायी परिक्रमा करुन ते श्री क्षेत्र गोकर्ण येथ आले व तेथे त्यानी आपल्या आध्यात्मिक कार्याची मुहूर्तमेढ रोवली. श्री कामत यानी त्यांच्या कार्याचे वर्णन रसाळ शैलीत करुन स्वामीच्या भरीव आणि महत्व-पूर्ण कामगिरीवर प्रकाशझोत टाकला आहे. श्रीधर स्वामींच्या कार्याचा आढावा घेतल्यावर श्री. कामत यानी स्वामींच्या काव्यनिर्मितीचा तपशीलवार परिचय करुन दिला आहे.एका अर्थी त्यानी त्या काव्याचे परिशीलन केले आहे यात शंका नाही.

या सर्व गोष्टी लक्षात घेता श्री, कामत यानी सिद्ध केलेले हे श्रीधर स्वामीचे चरित्र आगळे वेगळे असल्याचे जाणवते व त्यामुळे त्याला आध्यात्मिक साहित्याची आवड असलेला वाचकवर्ग मोठया संख्येने प्राप्त होईल यात शंका नाही.

**श्री स. शं. देसाई काणकोण**

शिवाजी विश्वविद्यालय, इतिहास संशोधक (नि)

## प्रस्तावना

अॅड. मंजुनाथ कामत गुरुजी श्री.मलिकार्जुन वि.हायस्कूलातील माझे शिक्षक. विद्यार्थीदशेत त्यांच्याबद्दल माझ्या मनात जो आदर भाव निर्माण झालेला होता तो आजतागायत टिकून आहे.

शिक्षक मुख्याध्यापक ह्या नात्याने त्यानी शिक्षण क्षेत्रांत अनेक वर्षे विद्यादानाचे पवित्र कार्य केलेले आहे. त्यांचे विद्यार्थी अनेक क्षेत्रात नावलौकिक मिळवित आहेत.

श्री. कामत गुरुजी समाज कार्यात विशेष रस घेतात. काण–कोणात जे त्यानी समाजकार्य केलेले आहे त्यात अनाथ, गरीब विद्यार्थ्यांची निवासाची, खाण्यापिण्याची व शिक्षणाची सोय व्हावी म्हणून आम्हा सर्वांना बरोबर घेऊन स्थापन केलेले माताजी मंदिर वसतीगृह हे विशेष वाखाणण्यासारखे भरीव कार्य आहे

सध्या ते वकीली करीत आहे पण तो पेशा नसून त्याला समाज–सेवेचाच अधिक सुगंध येतो आहे असे म्हटल्यास अतिशयोक्तीचे होणार नाही असे मला तरीं वाटते.

त्यानी आतापर्यंत नियतकालिकातून तसेच पुस्तक रुपाने अनेक प्रकारचे लिखाण प्रसिद्ध केलेले आहे. ते एक उत्कृष्ट कवि पण आहेत.

हल्ली त्यांचा ओढा अध्यात्माकडे वळलेले आहे असे त्यांच्या वागण्यावरुन तसेच ते करीत असलेल्या लिखाणावरुन दिसून येत आहे.

हल्ली तर त्यानी श्री श्रीधर स्वामी महाराजांच्या मारुती

महात्म्य ह्या एकशें-एकवीस पद्यरुपी ग्रंथाचा अनुवाद सरळ गद्यात करुन सामान्य वाचकांची एक प्रकारे सेवाच केलेली आहे.

या पद्यरुपी ग्रंथाचा गद्यात अनुवाद करताना श्री कामत गुरुजीनी आपल्या सरळ सोप्या भाषेतून काही प्रसंग थोडक्यात अतिशय तपशिलवार वर्णिलेले आहेत. ह्या छोटयाशाच गद्यरुपी ग्रंथातून मारुतीराय हा शिवाचा अवतार कसा हें पटवून देतानाच श्रीरामसेवक मारुतीराय सीतामाईचा शोध घेण्याकरिता लंकेला जाऊन अनेक दिव्यातून पार पडून परत श्रीरामाजवळ येईपर्यंतच्या धाडसी प्रवास वर्णनाचे संम्यक् दर्शन आम्हाला घडविलेले आहे.

कपिकुल श्रीश्रेष्ठ मारुरायाची वज्रदेही,सामर्थ्यवान, भक्तश्रेष्ठ शौर्यवान, महाज्ञानी' विवेक संपन्न,रुद्रावतारी, शिवस्वरुप मदनाचा शत्रु अशी अनेक रुपे वाचकांसमोर ठेवून मारुतिरायाकडे बघ-ण्याची एक वेगळीच दृष्टी आम्हांला दिलेली आहे.

श्री कामत गुरुजीचे हें गद्यरुपी "मारुती महात्म्य" अतिशय वाचनीय असून सामान्य वाचक वर्गाला सुध्दा समजण्यास सोपे व संग्रही ठेवण्यासारखे झालेले आहे.

श्री कामत गुरुजीच्या हातून अशीच साहित्यसेवा होवो, हीच इच्छा.

मार्टीन मिनिन फेर्नाडीस
शिक्षक व समाज सेवक, काणकोण





# श्री श्रीधर स्वामी महाराजांचा परिचय

श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीधर स्वामी यांचे मूळ नांव श्रीधरच असून वडिलांचे नांव नारायणराव व आईचे नांव कमलाबाई व आडनांव पतकी. ते तीन वर्षाचे असताना त्यांचे वडील व बाराव्या वर्षी मातोश्री ह्या इहलोक सोडून गेले. त्यांचा जन्म श्री दत्तजयंती दिवशी ७ डिसेंबर १९०८ रोजी म्हणजे शके १८३० कीलकनाम संवत्सर सायंकाळी ७॥ वाजता गाणगापुराहुन जवळच असलेल्या चिंचोळे या गांवी झाला. आईवडील निवर्तल्या-वर त्यांच्या आत्यानी त्यांना पुणे येथील अनाथ विद्यार्थी गृहात पाठविले. ते माधुकरी मागून शिक्षण घेत. त्यांचे शिक्षण त्या वेळच्या इंग्रजी सातवी पर्यंत झाले. पण त्यांना ह्या संसारात आसक्ती नसल्याने त्यांनी १९२० मध्ये पुणे सोडले व ते सज्जन-गडावर येउन राहिले. तेथे त्यांनी समर्थांची सेवा करुन आपले आयुष्य कठोर तपस्येत घालविले. इथूनच त्यांच्या पारमार्थिक जीवनास प्रारंभ झाला. सेवा व साधन द्वारे त्यांना सिध्दि प्राप्त होवून परमहंस परिव्राजकाचार्य उपाधि प्राप्त झाली. पण ते सज्जनगडावर मठपती बनून न राहता श्री समर्थांच्या आज्ञेने १९३० च्या दासनवमीस सज्जनगड सोडून पायी प्रवास करीत दक्षिणेस निघाले ते थेट गोकर्णक्षेत्रास येवून पोहचले.

# ११

## कार्यास आरंभ

गोकर्णक्षेत्री येउन त्यांनी श्री महाबळेश्वराचा अष्टबंध विधी पूर्ण करवून घेतला. तिकडून ते कुमठा होन्नावर मार्गे रामतीर्थ कुंडा-कडे पोहचले. तिथे व वाटेत अनेक ठिकाणी त्यांनी अनेक जीर्ण देवस्थानांचा उध्दार करविला. त्यांच्या आगमनाने व त्यांच्या दर्शनाने लोकांमध्ये भगवत् भक्तीचा पूर लोटत होता. लोकांच्या आर्थिक व कायीक मदतीने त्यांनी अशी कामे करवून घेतली. ते नंतर शिगेहळळी, सिरसी, सिध्दापूर मार्गे बनवासी क्षेत्रात पोचले. प्रत्येक ठिकाणी ते प्रवचने करीत व लोकामध्ये धर्म–जागृतीचे कार्य करीत. पुढे ते कोडचाद्री मार्गे शृंगेरी संस्थानास पोचले. तिकडे कांही दिवस वास्तव्य करुन पुन्हा सज्जनगडावर १९३५ साली आले. तिकडे ते १९४० पर्यंत राहिले. त्या पांच वर्षाच्या अवधीत त्यांनी संस्कृत, मराठी व कानडी भाषेतून अनेक गद्य पद्यरुपी धार्मिक ग्रंथ लिहिले.

नंतर त्यांच्या कर्नाटकातील भक्तगणांच्या आग्रहावरुन ते पुन्हा सज्जनगड सोडून १९४३ साली सागर तालुक्यातील वर–दळ्ळी नांवाच्या निबीड अरण्यात छोटासा आश्रम बांधून आपल्या ब्रम्हचर्याश्रमातून थेट वानप्रस्थाश्रमामध्ये प्रवेश करुन राहिले. ही गोष्ट १९४३ विजयादशमीस घडली.

श्रीधर स्वामीजींनी नंतर संचार करुन चिकमंगळूर, मंगळूर, कळ्ळे, मैसूर, कुरगड्डी अशा कर्नाटकातील स्थानांना भेट

दिली व उत्तर भारतामध्ये जाउन गिरनार, बद्रीनारायण, अयोध्या, श्रीकाशी व उत्तरकाशी या क्षेत्राना सुध्दा त्यांनी भेट दिली. या सर्वठिकाणी त्यांनी आपले चातुर्मास आटोपले व विपुल तप:साधना केली. तद्नंतर १९४२ साली ते पुन: दक्षिण भारतात आले व तंजावूर मार्गे रामेश्वर क्षेत्रास गेले. या प्रत्येक ठिकाणी त्यांनी धर्म प्रवचने करुन लोकामध्ये धर्मजागृती केली. त्यांना अपार शिष्यवर्ग व भक्तगण मिळाला पण त्यांनी कुणासही आपला शिष्य असा केला नाही. सर्वच शिष्य त्यांना सारखे होते· त्यांच्यात अचाट शांति, प्रखर वैराग्य, आर्यसंस्कृतीचा जाज्वल्य अभिमान, काटेकोर धर्माचरण व अत्यंत प्रेमळ स्वभाव यामुळे जे कोण त्यांच्या सन्निधीत आले, ते आपले जीवन सुखमय करुन सन्मार्गाला लागले.

त्यांच्या तसबिरी घरोघर झळकू लागल्या व लाखों भक्तांचे ते आराध्य गुरु बनले. त्यांच्या अहोरात्र नामस्मरणाने व त्यांनी शिकविलेल्या तत्वाचरणाने लाखो लोकांच्या जीवनातील अडचणी कष्टे दूर झाली पण स्वामीजी मात्र नेहमीच तत्वचिंतनात व समाधीत दंग असत· त्यांनी कधी साधी विश्रांतीही घेतली नाही.

## वरदळ्ळीमध्ये चिरसमाधी

अशा तऱ्हेने त्यांच्या भक्तिमार्गाचा प्रचार कर्नाटक व महा–राष्ट्र मध्ये फार जोरांत चालू असताना १९७२ साली स्वामीजींनी उच्च कोटितील समाधीत दिवस, आठवडाच नव्हे तर महिनाभर ते एका खास बांधलेल्या समाधीखोलीमध्ये आपणास डांबून घेऊन राहू लागले व एका छोट्याशा भोकातून श्वासोश्वासापुरती

हवा घेत. अशा परिस्थितीत म्हणण्यापेक्षा समाधी स्थितीत असताना १९७३ च्या फेब्रुवारी म्हणजे शके १८९५ चैत्र वद्य द्वितीया बुधवारी रोजी आपल्या योगशक्तीनें देहातून आत्मा काढून एका परदेशातील आमच्याच मूळ हिन्दूधर्मातील शिवलिंगाकडे (जे सध्या परधर्माच्या नावाने ख्यात आहे.) पोचण्याचा प्रयत्न केला. पण तिकडून आत्मा परतताना त्यांचीं आत्मशक्ती तिकडेच अड–कली व ह्या देहात पुनः प्रवेश करू शकली नाही. तेव्हा त्यांच्या असंख्यात भक्तगण, शिष्यवर्गांनी त्यांच्या पार्थीव देहाला वरदळळी येथे चिर समाधी दिली. त्या दिवशी अख्खा कर्नाटक हळहळला व कित्यक शहरांत हरताळ पाळले गेले. मुंबईमध्ये सुध्दा महा–राष्ट्रीयांनी तसेच केले. आज वरदळळी हे एक पवित्र यात्रा स्थान बनलेले आहे.

## श्रीधर स्वामीजींचे ग्रंथ

परम पूज्य श्री श्रीधरस्वामीजीनी लिहीलेल्या ग्रंथापैकी 'रामपाठ' 'समर्थपाठ' अशा दोन मराठीग्रंथाची ख्याती अलौकीक आहे कारण, सर्व सामान्य माणसास, मुमुक्षु लोकांस तारण्याकरिता त्यांना सम-जतील अशा भाषेतून हे ग्रंथ लिहून आमच्यावर अनंत उपकार केलेले आहेत.

श्री 'समर्थपाठ' वाचताना आम्हाला असे वाटते की श्री समर्थ भक्तांच्या मुखातून जणू काही श्री समर्थच बोलत आहेत. श्री समर्थांनी आम्हा सर्वांना समर्थ करावे व राष्ट्राचे दौर्बल्य नाहीसे करावे या एकमेव हेतूनें ग्रंथद्वय लिहीले गेले आहेत.

या ग्रंथानंतर स्वामीजींनी तिसरा ग्रंथ जो लिहिला तो सुंदर–कांडातर्गत मारुती-महात्म्य' हे पद्यरुप असून यांत एकूण एकवीस पद्ये आहेत. श्री मारुती–रायांचे सर्व गुण विशेषणांचे यात वर्णन असून त्यांच्या पराक्रमाची जाणीव आम्हाला करुन दिलेली आहे. पण प्रत्येकवेळी मारुती हा ' रुद्र ' गण असल्याचा प्रत्ययास आणून दाखविल्यामुळे हा ग्रंथ म्हणजे ' रुद्रमहात्म्य ' च म्हणावे लागेल. मारुतिरायाची म्हणजेच महारुद्राची महत्तमतेची सम्यक कल्पना या काव्यातून समजून येते.

या ग्रंथाचे पद्यरुप पठण केल्याने मोठमोठया अडचणीवर जसा मारुतिराय मात करु शकला तसे आमच्या आयुष्यात करू शकू अशी ग्वाही स्वामीजी देतात ते खरे आहे. याचा अनुभव आम्हाला आमच्या निज आयुष्यात आलेला आहे. पण त्यांच्या कित्येक गहन काव्य–पंक्तीतून सरळ अर्थ काढून तो सामान्य माणसांना समजावा याकरिता इथे गद्यरुपी अनुवाद मी यथामतीने केलेला आहे. तो समजून घ्यावा. हीच समर्थचरणी व आपल्या ठायी नम्र विनंती.



# गद्यरूपी मारुती महात्म्य

श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य भगवान श्रीधर स्वामी महाराज यांनी लिहीलेलें मराठी भाषिक सुंदरकांडातर्गत श्री मारुती महात्म्य मी पठण केले. त्याचा माझ्यावर फार सुंदर परिणाम झाला. श्री समर्थांच्या प्रेरणेनेच म्हणा मी ह्या महात्म्याचा अर्थ लावण्याचा प्रयत्न करीत आहे.

ह्या महात्म्यात श्रीधरस्वामी महाराजांचे असे म्हणणे आहे की मारुतिराय हा शिवाचा अवतार होय. ह्या तत्वाचा ते पुरस्कार करीत आहेत. विश्वाचा निर्माता ब्रह्मदेव, पालनकर्ता विष्णुदेव, तर संहारकर्ता शिवदेव आहे, मारुति–रायाने लंकेचा विध्वंस करुन राक्षसांचा संहार केला ते कार्य म्हणजे शिवाचेच बजावलेले कर्तव्य होते असा त्यांचा सुचविण्याचा उद्देश्य दिसतो. भगवान विष्णुचा सातवा अवतार श्री रामरायाला श्री शिवावतार मारुतिरायाने साथ देऊन "ईश–विष्णुसी" भेद नसून 'हनुम–रघुपती' पिंड अभेद आहे असे श्रीधर स्वामी सुचवितात. अशा या महान गहन तत्वाचा अर्थ लावण्याचा प्रयत्न करणाऱ्या मजसारख्या संसारी पामरास प्रेरणा शक्ती देणारे श्रीधरस्वामी महाराजांशिवाय दुसरे कोण समर्थ बरे असणार ?

## श्लोक पहिला :–

सारे योगी ज्याचे विरति सुख प्रार्थिती, ज्या नेति शब्द द्वारे सकळ निगम गाती, सर्वकल्याणमूर्ति निरवधि सुखराशी (ज्याला) मारुति ही सुकीर्ती ( असा तो ) हा शिवचि अवतरे।

**अर्थ :–**

योगिलोकांना विरती सुखाची महती कळली आहे, असे निरवाक्षि ( चिरंतन ) सुख अनुभवणाऱ्या मारुतिरायाला ते प्रार्थना करतात. व निगमा ( वेदान्त ) 'नेति' ( ते हे नव्हे ) शब्दाने ज्या शिवरुपाचे महत्व गातात, त्या शिवरायाचा अवतार मारुति ह्या नावाने सुकीर्ती ( सुप्रसिध्दी ) पावलेला आहे. ती सर्वांची कल्याण करणारी मूर्ति ( मूर्तस्वरुप ) आहे. शिवाला जे गुण लागू आहेत व त्याचे जे महत्व जाणले आहे तेच गुण व महत्व मारुतिरायाच्या अंगात असल्याचे आढळून येतात. व त्याचमुळे तो शिवाचाच अवतार असल्याचा प्रत्यय येतो.

पुढील पद्यामध्ये श्रीधरस्वामी महाराज शिवाचे रूपच प्रत्यक्ष मारुतिरायात पाहतात. सृष्टीसंहारी शिव सृष्टीचे पालन करणाऱ्या विष्णुला सहाय्य करण्यासाठी भूतलावर हनुमंत रुपे अवतरले. त्यांनी शिष्याची भूमिका जरी घेतली तरी आपल्या कर्तुत्वामध्ये गुरुसमान असणाऱ्य श्री रामाचाही बरोबरी केली. तसेच आपले यश हे श्री रामाच्या आशिर्वादाने मिळाले. असे करताना सुग्रीव हा एक जीव श्रीरामासारख्या ब्रह्मात ऐक्य केला असे उदाहरणाने दाखवून दिल आहे.

दुसऱ्या पद्यामध्ये श्रीधरस्वामी मारुतिरायाला वंदन करुन म्हणतात, " जयि माया न वसूत ( रहाते ) व ज्या स्वरुपात न उभ्दवे, जो सुकरुणेने अमित निज ज्ञान वोपी, व जो सकळ विषय बाधा नासि, व संसार–सिंधु ( तारी ) ऐसा दीनबंधु मारुति ( आम्ही ) निशिदिनी वंदू.

जो भवभय बिघडी, व मायिका भेडसावि ( आपल्या ) निज जनांचे दूरदृष्ट भेद करी, व दैन्या दूर करी, सकळ भ्रम निवारण करी, कर्मपाशांना तोडी ( असा ) मारुति ब्रह्मचारी व अनुपम बलाचा गाढा ( साठा ) आहे.

ह्या दोन वंदनपर पद्यानंतर लगेच श्रीधरस्वामी मारुति–रायाला आपल्या अवतार कार्याची जाणीव झाली असल्याचे सुचवितात.

चौथ्या पद्यात ते म्हणतात की " हा मदनाचा शत्रू ' सदोदित मनात फार विचार करतो की मी ब्रह्मचारी असून मला कोणतेच मायासंग नाहीत. ( म्हणजे मला कोणत्याही कर्माचे बंधन नाही) पण मला पार्वतीचा पती श्री शिव म्हणून लोक जाणतात, त्याचा प्रत्यय आणून देण्याकरिता मी कर्म ( राक्षस वध ) करतो ' अर्थात शिवाचे जे विध्वंस करण्याचे कार्य आहे ते मी करतो.
अशा अर्थाने मारुतिरायाची खूण शिव स्वरुपाची दाखविल्या–नंतर ह्या संहारी शिवाने कोणत्या अवस्थेत अवतार घेतला व कोणते कुळ शोधून काढले तसेच आपल्या जन्माबरोबर जे अघटित कार्य करुन सर्वांना साक्ष पटवून दिले कि तो प्रत्यक्ष अंशरुपी

अवतार आहे ह्याचा उलगडा करतात.

पाचव्या पद्यात श्रीधरस्वामी महाराज म्हणतात की ज्याने आपले अनुपम ( उपमा नसलेले ) अस्तित्व स्वतःच्या ब्रह्मचर्याने दाखविले, त्याने मातेच्या पोटामध्ये कौपिन लावले. त्याचे बळ समजत नाही, तसेच त्याच्या बुध्दिचा अंतही लागत नाही, असा तो मारुति जन्मतः सर्वशास्त्रामध्ये निपुण होऊन आला व धैर्याचा पर्वत होऊन अढळ उभा राहिला.

सहाव्या पद्यामध्ये श्रीधरस्वामी म्हणतात की कपिकुलामधील शुध्द अशा अंजनीला आपली आई म्हणून निवडली, कारण तिने पूर्वी केलेले निर्मळ तप शिवाच्या हृदयाला फारच आवडले होते ज्याप्रमाणे शुध्द शुक्तीमासांत जसे पावसाचे पाणी पडल्याने रुचिर मोती निर्माण होते त्याचप्रमाणे त्यांनी अंजनीच्या गर्भात पवित्र वीर्य साठविले जेणे करुन अंजनेयाचा जन्म झाला.

सातव्या पद्यामध्ये श्रीधरस्वामी म्हणतात की ह्या कपिकुळ श्रीश्रेष्ठ मारुतिरायास सृष्टीत साम्यच नाही. त्याने जन्म घेता घेताच सूर्यबिंबास पाहिले व तो अमाप महिमेचा शिव तो मीच आहे हे दाखविण्याकरिता त्याने सूर्यबिंबास आवळण्याचा प्रयत्न केला.

श्रीधरस्वामी महाराज आठव्या पद्यात व पुढच्या नवव्या पद्यात ह्या विश्वातील सूर्य, चंद्र, राहू. केतु वगैरे ग्रह जे दिक्पाल म्हणून घेतात ते शिवावतार मारुतिरायाच्या शक्तिपुढे फिके पडतात हे सांगतात. सातव्या पद्यात श्रीधरस्वामी म्हणतात की सूर्य,

चंद्र, राहू व केतु हे सर्व मारुतिरायाच्या शेपटीच्या माराने हैराण झाले. मारुतिराय जन्मताच वज्रदेही असून फार शौर्यवान होता त्याच्या आपल्या मुष्टीमाराने तो कळिकाळास भडकवीत होता त्याला उपमाच नाही.

नवव्या पद्यामध्ये श्रीधरस्वामी म्हणतात की मारुतिराय जन्मताच महाज्ञानी होता. तो एक विभूतिच होय. त्याने ज्ञानमय बाह्य सूर्याला आपल्या ज्ञानानेच जणु झाकले, त्याच्या या अज्ञान हरण करणीच्या कार्यात ज्या अष्ट दिक्पाळांनी येवून त्याच्या कार्यात विघ्न आणण्याचा प्रयत्न केला त्यांना त्यांने जबर तडाखा हाणला. अशा मारुतिरायाच्या अचाट म्हणजे महान रुद्रशक्तीचे वर्णन स्वामी महाराजांनी केलेले आहे.

दहाव्या पद्यामध्ये श्रीधरस्वामी दाखवून देतात की हा महान रुद्र शिव कपिकुळामध्ये जन्म घेऊन श्री रामाचा आदरपूर्वक शिष्य बनून सेवा करु लागला. आपले शरीर हे विषय सुख भोगण्या-करिता नसून श्री रामसेवेतच त्याची सार्थता आहे हे दाखविण्या-करीता झटू लागला.

पुढे अकराव्या पद्यामध्ये श्रीधरस्वामी म्हणतात की रुद्रावतार मारुतिराय जरी श्रीरामाचा शिष्य बनून राहिला असे जगास वाटते तरी त्याचा प्रताप गुरुपेक्षा कमी नव्हता. ते दोघेही सम-प्रतापी होते, फक्त भेद हाच की श्रीराम गुरु व मारुतिराय शिष्य. कारण विष्णु व शिवास, हरि व हरास भेद नसून त्यांचा ह्या मानवी अवतारामध्ये सुध्दा ते एकपिंडच होते. कारण रामायणा-

तील कथेप्रमाणे जेव्हा पुत्रकामेष्ठी यज्ञापासून मिळालेला पिंड राजा दशरथाने आपल्या कौसल्या, सुमित्रा व कैकेयी अशा तीन राण्यामध्ये वाटण्यास उचलला तेव्हा एक गरुड पक्षी येऊन त्याचा एक भाग आपल्या चोचीने झडप मारून घेवून गेला तो नंतर समुद्रात पडला व अंजनीला मिळाला त्यायोगे तिला हनुमान पुत्र झाला अशी माहिती असल्याने हे सिध्द होते की मारुतिराय हा राम लक्ष्मणा प्रमाणे एक पिंडी होता. श्री रामामध्ये विष्णुचा अंश तर मारुतिरायामध्ये शिवाचा अंश झाला इतकेच पण वर सांगितल्याप्रमाणे हरी हर वेगळे नसून एकच आहेत.

बाराव्या पद्यामध्ये श्रीधरस्वामी गुरू व शिष्य ह्यांच्या परस्पर संबंधाबद्दल ख्याती सांगत असून निर्द्वंद्व जे ब्रह्म आहे म्हणजे ज्या विश्वामध्ये भेदाभेद भाव नाही तेथे गुरू व शिष्यामध्ये समपद म्हणजे समभाव वसतो पण योग्य शिष्याकडून गुरू सेवा करुन घेणेस लायक ठरतो असा शिष्य दाखवून देतो कि गुरुभजनानेच ह्या ससारातील तापत्रयापासून मुक्त होण्याचा मार्ग आहे. करिता शिवाने आपण शिष्यस्थान पत्करुन हे थोर महत्व जगास पटवून दिले.

ज्या रूद्राला जगाचा संहार करण्यास क्षण ही लागत नाही व जो भयंकर असामान्य शक्तीचा आहे त्याने श्रीरामाचे शिष्यत्व पत्करले आणि पाप्यांचा नाश करण्याकरिता श्रीरामाची व सुग्री– वाची मैत्री घडवून आणली. सुग्रीव हा जडसृष्टीवरील एक जीव व श्रीराम हा ईश्वरी अवतार म्हणजे ब्रह्म, त्याची युती म्हणजे

जीव-ब्रह्माची एकी होय ती मारुतीरायाने साधली असे श्रीधरस्वामी तेराव्या पद्यामध्ये सुचवितात आणि ही एकता सुग्रीवाच्या म्हणजे मारुतिरायाच्या कपिकुळात साधली गेली हे विशेष होय.

चौदाव्या पद्यामध्ये श्रीधरस्वामी म्हणतात की सद्‌गुरू हा सर्व जगामध्ये आदिकर्ता आहे. व शिव हा सर्व विरक्त (कशामध्येही आसक्ति नसलेला) योगी लोकास वंदनीय आहे. शिवाने रामामध्ये खरे गुरुस्थान पाहिले व आपण मारुतिरायाच्या (जन्म) रूपाने साकार संपूर्ण आस्तित्व वाहून (राहिला) घेतले.

अशा थोर, ज्ञानी, विरागी व भक्त श्रेष्ठ मारुतिराय ज्यांच्या सामर्थ्यशक्तिच्या यशाची कीर्ती गाजत आहे जर त्याने मनात आणले तर हा विश्वासू आपल्या शेपटीनेच क्षणार्धात वेढा घालू शकेल व हा जो आहे तो सहज उपटून काढू शकेल असा हा रूद्रावतार मारुतिराय आहे' हे पंधराव्या पद्यामध्ये सुचवितात.

अशा ह्या मारुतिरायाचे चरित्र सर्व लोकांस कल्याणकारी आहे त्याला ह्या जगात किंचित विकार व स्वार्थसुध्दा शिवत नाही त्याचा त्याग अमाप पलीकडचा असून त्याने सर्व भल्या माणसांच्या सुखासाठी आपले आयुष्य श्रीरामसेवेत अर्पण केले असे सोळाव्या पद्यामध्ये सुचवितात.

असा श्री मारुतिराय रघुनाथ श्रीरामाचा फार आवडीचा आहे. त्याने सीतेचा शोध फार यशस्वीपणे केला. त्याच्या बळ सामर्थ्याच्या तोडीचे कुणीच नाही असा हा फक्त शक्तीतचनव्हे तर बुध्दिने सुध्दा परिपूर्ण असून कोणत्यावेळी कोणते काम केले पाहिजे

ते तो जाणणारा आहे अशी त्याची बुध्दिमत्ता सतराव्या पद्यामध्ये वर्णन केलेली आहे.

## रामायण कथा सुरुवात

येथपर्यंत श्री मारुतिरायाच्या अचांट शक्ति बुध्दि व सामर्थ्य वर्णन करुन श्रीधर स्वामीं आता रामायणातील कथेस सुरूवात करतात. लंकेमध्ये बंदिस्त असलेली सीतादेवी काय करते, तिला शोधण्यास कपिकुळाने काय केले, वगैरे घटनांचे वर्णन श्रीधरस्वामी अठराव्या पद्यापासून सांगण्यास सुरूवात करतात.

अठराव्या पद्यामध्ये श्रीधरस्वामी महाराज रूद्रावतार मारुति-राय सीता शोध करतो, तो प्रकार कसा होता ह्यावर एक विवरण देतात. स्वामी महाराज म्हणतात की रावण हा देशाभिमानी व विषयसुखात गढून गेला होता म्हणून त्याला खरे सुख कोणते ते समजून घेण्याची स्वबुध्दिच चोरीस गेली होती पण विवेक म्हणजे सारासार जाणण्याची बुध्दि असलेला मारूतिराय रावणाने हरण केलेल्या सीतेला शोधण्यात आपले बुध्दिसामर्थ्य पणाला लावत होता ह्याचा अन्वयार्थ असा निघतो कि फक्त देहशक्तीने रावणाने आपल्या कचाट्यात सापडविलेल्या सीतेस शोधून काढणे शक्य नव्हते तर त्या कार्यात अचाट बुध्दिचाही उपयोग करणे आवश्यक होते व ते गुण मारूतीरायात होते.

असा विवेकसंपन्न मारुतिराय प्रथम आपल्या शक्तीमध्ये यम, नियम आदि अंगे साधून नक्षत्रामध्ये जसा चंद्र शोभतो तसा कपि

कुळात हनुमन्तराय शोभत होता. त्याने आपल्या सहकारी धष्ठपुष्ठ कपीना घेऊन रघुपति राघव रामाचा जयघोष करीत दूर दूर वनांत उड्डाण करुन दक्षिण हिंदुस्थानातील अरण्य भागात सीतेचा शोध घेण्याचा प्रयत्न केला.

अशा तऱ्हेने एकोणीस ते सव्वीस पद्यामध्ये मारुतीराय आपल्या सहकार्यांना घेऊन घोर अरण्ये व ओसाड भागात सीतेचा शोध करण्यात कसा गढला होता व शेवटी ते दक्षिण भारताच्या टोकावर म्हणजे सध्याच्या रामेश्वर सेतुपर्यंत कसे पोहचले ह्याचे वर्णन केलेले आहे.

विसाव्या व एकविसाव्या पद्यामध्ये मारुतिराय आपल्या सहकार्यांनिशी अत्यंत निबिड अरण्ये, रुक्षप्रदेशात पोचला जिकडे पशु, पक्षी, झाडे व गवत तसेच पाणी सुध्दा नव्हते. त्याचे पुष्कळ सहकारी तहानेने व भूकेने व्याकुळ होते. वाटेत त्यांना भयानक राक्षस भेटले पण कपि श्रेष्ठांनी त्यांना मारून टाकले.

अशाप्रकारे श्रीरामाचा जयघोष करीत सर्व संकटे दूर करीत ते मारुतिरायाच्या नेतृत्वाखाली चालले होते. त्यांतील कित्येकजण भुकेने व्याकूळ होऊन मागे राहिले तर काहीजण काळोख पाहून झोपले. पण अशांचे मारुतिरायाने आपल्या शेपटीने बांधून रक्षण केले म्हणजे त्याने उचलून नेले.

श्रीधरस्वामी महाराज बावीसाव्या पद्यामध्ये महादेवाच्या मारुति-अवतारातील महात्म्याचे वर्णन करतात. मारुतिराय हा वायुदेवाचा पुत्र मानला जातो. वायुशिवाय जग किंचितही जगू शकत नाही.

जे जगते ते जग होय. हा वायुरूपी मारुतिराय जगातील सर्व जीवांचा रक्षक व चालक असून त्याचे हृदय महासागराप्रमाणे अथांग खोल आहे. त्याच्या पायावर आपले मन एकाग्र करतात. पंचप्राणापैकी प्रमुख महाप्राण जो विश्वास राखून आहे तो आपल्या चांगल्या गुणाने सर्वत्र व्यापून आहे.

असा हा मारुतिराय वानराचा देह धारण करुन रामसेवेस वाहून घेऊन आपली कीर्ति ह्या लहानशा देहस्वरुपातून प्रगट करीत आहे. तो हा मारुतिराय कल्पनेबाहेरील गोष्टी लहानशा देहाने घडवून सर्व विश्वामध्ये सामर्थ्यवान व पूजनीय झालेला आहे.

अशा महाप्रतापी रूद्राला आपल्या तिसऱ्या नेत्राने ब्रम्हांड जाळण्यास मुळीच वेळ लागत नाही. तो रावणास क्षणार्धात नष्ट करण्यास समर्थ आहे. पण हा सर्व विश्वाची गती जाणणारा, असे साहस न करता वाल्मिकीने आधीच भाकीत केलेल्या प्रमाणे श्री रामाच्या हातून रावणाचा वध व्हावा ते खरे करण्यास हातभार लावत आहे.

आपल्या स्वतःच्या महान तेजाने हा महादेव काहीही कार्य साधू शकतो. त्याच्या मनात कोणत्याही कार्याबद्दल लहान किंवा मोठी अशी भावना येतच नाही साऱ्या विश्वात तो ' महान 'देव च म्हणून प्रसिध्द आहे. त्याला हे छोटेसे ( रावणवधाचे ) कार्य करण्यास काय मोठे आश्चर्य असेल ? असा सवाल करुन ह्या दोन पद्यामध्ये ( चोवीस व पंचवीस ) स्वामी महादेव रुद्राचा महिमा वर्णन करतात.

श्रीधरस्वामी महाराज आपल्या पद्यामध्ये मारुतिरायाला महादेव रूद्राच्या अवतार जो वायुरूपे रूपे प्रगट झाला व तोही पूर्ण नर नव्हे तर वानरकुळात ह्या आश्चर्याचा उलगडा करतात. रावण–वध ही भौतिक उपाधी होती, पण हा रावण खुद्द महादेवाचाच परमभक्त बनून सर्व शक्तीमान झालेला होता. पण पुढे त्याच्या दूराभिमानाने तो महादेवास नावडती कामे करु लागला तेव्हा महादेवाने श्रीविष्णुची पाठ धरुन आपण वानरकुळात जन्म घेतला. हे एक तऱ्हेचे छुपे रुप घेऊन आपण महादेव आहे हे न कळविता वायुपुत्र हनूमंत रूपाने रावणाचे दुष्कृत्य प्रत्यक्ष पाहून त्याला ठार मारणेच योग्य आहे ह्या निष्कर्षास पोचला व त्याप्रमाणे आपली पाउले घालता झाला.

सव्वीसाव्या पद्यामध्ये श्रीधरस्वामी महाराज सीताशोध कार्याचा विडा उचललेल्या कपी कुळामध्ये काय घडले त्याचे वर्णन करतात. जेव्हा सुग्रीवाने श्रीरामास सहाय्य करण्याचे मान्य केल व आपल्या कुळातील महागणांना सीतेचा शोध घेण्यास कोण जाईल अशी पृच्छा केली तेव्हा हे काम आपण सर्वांनी मिळूनच केले पाहिजे असे निश्चित झाले पण प्रश्न होता कि लंकेत जाणे म्हणजे समुद्र पार करुन जायला हवे. ते काम कोण करणार ? जटायूकडून कळून चुकले होते कि रावणाने सीताचे अपहरण केलेले आहे म्हणून आता फक्त लंकेत पोहचणारे कसे असा प्रश्न होता.

अशातऱ्हेने कपीदळ विचार करीत होते तेव्हा त्यांच्यातील एक प्रमुख जांबुवन्त सांगता झाला की हे समुद्रपार करण्याचे काम फक्त मारुतिच करु शकेल कारण मारुतिरायाच्या अचाट शक्तीची

कल्पना त्याला माहीत होती. म्हणून तो म्हणतो कि मारुतिरायाच्या योग्यतेची तुलना कुणाबरोबरही करणे शक्य नाही.

ह्याचे विवरण करताना तो जांबुवत म्हणतो कि आपल्या दळा-मध्ये मारुतिराय नेहमीच असल्याने तो सर्वांचा अतिशय परिचयाचा झालेला आहे व अशा अतिपरिचयाने आपण त्याच्या योग्यतेची महती समजू शकलो नाही. सर्वांना वाटते कि तो मारुति आपल्या-प्रमाणे एक कपी आहे. पण तसे नसून तो कपीश्रेष्ठ आहे व त्याच्या मध्ये रुद्राची शक्ती आहे असे विवरण जांबुवंताने केल्यानंतर सर्व कपी हर्षोभरीत झाले.

तेव्हा सर्व कपीदळ मारुतिरायास प्रार्थना करते झाले कि मारुति राया तू आमच्यातला एक असला तरी तू आमच्याप्रमाणे नाहीस. तू अचाट शक्तीचा असून सीतामाईचा शोध घेण्यास तूच समर्थ आहेस तेव्हा तू हे कार्य स्वीकारुन आम्हासर्वांस भूषणास्पद कर·

अशाप्रकारे नम्रतेने बोललेली वाक्ये ऐकून मारुतिरायाच्या अंगात स्फुरण चढले व आपल्या कुळाच्या अभिमानी मारुतिरायाने पुढील कार्य कसे करावे ह्याचा मनात विचार केला. व आपल्या खऱ्या बळाची प्रत्यक्ष कल्पना त्यांना येण्याकरिता थोडा आवेश अंगात आणून दाखविला.

अशातऱ्हने पांच पद्यात श्रीधरस्वामी महाराजानी मारुतिरायानें सर्वांनुमते अंगीकारलेली सीताशोध कार्याची कठीणता व ते काम करण्यास फक्त आपण (मारुतिरायच) समर्थ कसा आहे याची कल्पना आम्हास करुन दिलेली आहे. सुग्रीवाच्या सोबत नल, नील,

जांबुवन्त व हनुमंत असे चार महान पराक्रमी वीर होते पण त्यांच्यात मारुतिराय मात्र महासमुद्र पार करुन जाण्यास समर्थ होता हे इकडे भाकीत केलेले आहे व ह्या पद्यामध्ये पर्यायाने रूद्रमहिमाचे वर्णन केलेले आहे.

पुढील पांच पद्यामध्ये म्हणजे एकतीस ते पस्तीस ह्यांच्यामध्यं मारुतिराय सीतेचा शोध घेण्याकरिता लकेच्या दिशेने उडाला व त्यावेळी काय अवस्था झाली त्याचे वर्णन करतात.

हनुमन्ताने आपल्या सर्व कपिकुळास अश्वासन दिले कि मी लंकेच्या दिशेने जातो म्हणून त्याने अशी एक उडी मारली कि त्याच्या धडकेनं सर्व भूमी हादरली व वाटलं की हे जग नष्ट होईल की काय व त्याच्या उडीसरशी मोठा वारा सुटला.

म्हणून श्रीधरस्वामी म्हणतात कि जेव्हा हनुमानाने ज्या पर्वता–वरून उडी मारली तेव्हा तो पर्वत त्याच्या दडपणाने नाहीसा झाला व पाताळात गेला. ह्या थोडयाशा शक्तीप्रदर्शनात जर अशी परि–स्थिती झाली तर त्याची पूर्ण शक्ती ती केवढी मोठी असेल त्याची कल्पना केलेलीच बरी. त्याने आपल्या ह्या लहानशा उडीने आपल्या निजबळाची चुणुक ( झळक ) आपल्या सहकाऱ्यास दाखविली.

त्याने उडी मारताना धरणीकंप झाला त्या योगे कित्येक मोठे वृक्ष उन्मळून पडले. त्यांचे कोसळणे म्हणजे कडकड हा शब्द जय–जयकार अर्थाने होता व त्यांचे पडणे हे मारुतिरायास दंडवत घालण्याचा प्रकार होता ह्या महान वृक्षानी आजपर्यंत कित्येक वर्षे आपणास मोक्षप्राप्ती व्हावी म्हणू तप करण्यात घालविली. असे

त्याचे वर्णन केलेले आहे.

अशी आवेशयुक्त उडी मारल्यानंतर मारुतिरायास आपल्या निजबळाची कल्पना आली व तो मोठा आवेशयुक्त होऊन मनात म्हणाला कि आता मला ह्या राक्षसांचे भय मुळीच नाही. त्याच्या पाय आपटल्याने ( उडी मारताना ) जमीन हादरुन गेली.

आता राक्षसांचा अतःकाळ आला असे त्या महासागराला कळून आले व तो फार आनंदमय झाला व त्याने घाईघाईने जावून सर्व देवगणांसही बातमी पुरविली कि आता राक्षससंहार होणार म्हणून.

याप्रमाणे मारुतिराय आकाशमार्गे लंकेच्या दिशेने उड्डाण करीत आहे असे पाहून महासागर फार संतुष्ट झाला व तो मारुतिरायाचा गौरव करण्याचे मनात योजू लागला. श्रीधरस्वामी महाराज छत्ती-साव्या पद्यामध्ये म्हणतात कि अशाप्रकारे आपल्या परिसरातून महान शक्तिशाली हनुमानासारखा दिव्यपुरूष चालला असताना त्याला जर थोडा वेळ थांबवून जर आपण काही गौरव केला तर आपले मोठे भाग्य ठरेल. म्हणून तो महासागर ही चालून आलेली संधी न दवडविता झाला म्हणून तो धन्य होय.

श्रीधरस्वामी महाराज पुढे म्हणतात की सागरकुळश्रेष्ठ श्रीरा-माचा दास हनुमंत आपल्या धन्याच्या कामानिमित म्हणून सीता-सीतामाईचा शोध करण्यास जात आहे, तेव्हा याला जर आपण थोडी मदतकेली तर आपण ( महासागर ) थोडी उपकाराची फेड करा-वयास शकलो असे होईल असा विचार करू लागला हनुमंताचे

महासागरावरील उड्डाण पाहून मैनाक–पर्वत विचार करतो कि मारुतिराय आकाशमार्गे चालला आहे त्यास काही श्रम झाले असतीलच म्हणून त्याला काही काळ आपल्या पर्वतावर विश्रांती घेण्यास उद्युक्त करावे, त्या दृष्टिने तो मारुतिरायास प्रार्थना करि–ता झाला, मारुतिरायाने आपल्या भूपृष्टावर रहावे कारण तो अतिशय चांगल्या फळजातिने भरलेल्या उत्तम जातिच्या झाडानी भरलेला, व ज्याच्यावर मंद वारा झुळझूळ वाहाणाऱ्या झऱ्यावर वाहतो. तो मैनाक मारुतिरायाच्या दिशेने वर जाऊ लागला तेव्हा आपल्या वाटेवर हा अडथळा येत आहे असे पाहून तो महाप्रतापी हनुमंत अधिकच उंचावरून उड्डाण करू लागला.

अशा प्रकारे तो मैनाक पर्वत कितीही उंच वाढला तरी मारुति त्याच्याहीपेक्षा उंचावरून उड्डाण करतो व त्याचा केवळ वाराच पर्वतास स्पर्श करू शकतो हे पाहून त्या पर्वतास फार वाईट वाटले व तो मनुष्यरुप घेऊन मारुतिरायास प्रार्थना करिता झाला.

मैनाक पर्वत मारुतिरायास प्रार्थना करतो कि तू जर माझ्या भूभागाला पाय लावशील तर मी फार धन्य होईन. मी अतिनम्रतेने तुला माझे आतिथ्य स्वीकारण्याची बिनंती करीत आहे तू श्री रामाच्या कामानिमित्त जात आहेस तेव्हा तुझे जर काही श्रम मी कमी केले तर तो श्रीरामचंद्र फार संतुष्ट होईल. तो पर्वत पुढे म्हणतो कि पूर्वी जेव्हा इंद्राने पर्वतांचे पंख काढून त्यांना उड्डाण करण्यास असमर्थ करण्याचा प्रयत्न केला तेव्हा मी महासागरात लपून आश्रय घेतला व तूझ्या वडिलांच्या

म्हणजे वायुदेवाच्या कृपेने मी वाचलो हे माझ्यावर थोर उपकार आहेत म्हणून मी ही प्रार्थना तुला करीत आहे. ती आपण स्विकारावी.

अशा प्रकारची त्या पर्वताची प्रार्थना ऐकून तो रुद्ररूपी हनुमंत म्हणाला की मला मुळीच श्रम झालेले नाही तेव्हा तू मला कशाला विश्रांती देतोस ? असे म्हणून त्याने त्या पर्वतास हळूच बोट लावले. त्यावेळी तो पर्वत फार खाली दडपून आपल्या पूर्वीच्या जागी गेला.

श्रीधरस्वामी म्हणतात की जेव्हा त्या पर्वतास मारुतिरायाचे बोट हळूच लागले तेव्हा तो इतका दडपून खाली पातळात गेला, तर खुद्द मारुतिराय त्या पर्वतावर विश्रांती घेण्यास बसला असता तर काय बरे घडले असते हे सांगता येत नाही.

अशा प्रकारे हनुमंत आकाशमार्गाने उड्डाण करुन जाताना त्याने जरा कमीच वेगानं भ्रमण केले. तेव्हा वर उल्लेखिलेल्या मैनाक पर्वतासारखी घटना घडली. जो प्रतापी हनुमंत आपल्या बळाची पूर्ण जाणीव धरून आहे त्याला हे सर्व ब्रह्मांड नाश करण्याची आपल्यात रूद्रशक्ती आहे. याची कल्पना आलेली आहे. आता मारुतिरायामध्ये संपूर्ण रुद्रावतार संचार वर्तत आहे असे श्रीधरस्वामी महाराज या पद्य द्वारे सुचवितात.

श्रीधरस्वामी मारुतिस्तवनातून रुद्रमहिमाच वर्णन करीत आहेत हे आम्हाला जाणवते. पुढील शेहचाळीस ते एकोणपन्नास पद्यामध्ये श्रीधरस्वामी महाराज मारुतिरायाने लंकेच्या दिशेने आकाशमार्गे

उड्डाण करताना वाटेत सुरसा नावाच्या महान राक्षसिणीला ठार न मारता तिच्या आवासलेल्या तोंडातून प्रवेश करुन सूक्ष्मरूप घेऊन तिच्या कानातून कसा बाहेर पडला ह्याचे वर्णन केलेले आहे. सुरसा ही वायुदेवाची पत्नी असल्याने ती आपली सावत्र आई होते म्हणून तिला ठार न मारता तिच्या कचाट्यातून निसटून मारूतिरायाने आपल्या बुध्दी शक्तीचे श्रेष्ठत्व सिध्द केलेले आहे. रामरक्षा स्तोत्रामध्ये एक श्लोक मारूतिरायाच्या स्तुतीपर आहे. त्याच्यामध्ये हनुमंत हा " बुध्दिमतां वरिष्ठं ' असे संबोधिलेले आहे.

वाटेत आड आलेल्या मैनाक पर्वताला पाण्यांत लोटून आकाश–मार्गे पुढे जाताना त्याला अक्राळ–विक्राळ अशी सुरसा दैत्या पाहून मारूतिराय मनात म्हणतो की हिला मारणे योग्य नाही, पण मला माझा मार्ग मोकळा करून घ्यायचा आहे. ह्या कार्यात माझ्या बुध्दिची परीक्षाच होईल.

ही सुरसा कोणी नसून रावणाची लंका रक्षण करणाऱ्या महान भूतापैकी एक होती. ती मारुतीला पाहून आपला देह पसरून त्याच्या आड आली. तेव्हा मारुतीरायाने सुध्दा योग सामर्थ्याने आपण गरीमा देह धारण केला. पण तितकेच विचित्र सामर्थ्य असलेल्या त्या सुरसेने आपले शरीर आणखीन मोठ वाढविले व आपले तोंड आ वासून मारुतिला गिळण्यास त्याच्या पुढ्यात आली तेव्हा चपळतेने मारुतिरायाने लगेच ' लधिमा ' रूप म्हणजे योगमायेने सूक्ष्मरूप धारण केले व तिच्या उघडलेल्या तोंडात प्रवेश केला आणि तिच्या कानावाटे बाहेर येऊन उलट दिशेने

पसार झाला.

त्यावेळी हे चतुर काम बघून देवगण सगळे मारुतिरायाची स्तुति करून तो फार युक्तीवान आहे असे गुणवान करू लागले ते देवगण म्हणू लागले की हा हनुमंत दुसरा कुणी नसून प्रत्यक्ष रुद्रच आहे. तो फक्त महान शक्तीशाली आहे इतकाच नव्हे तर तो महान बुध्दिवान आहे.

देवगण म्हणाले की हनुमंताने सुरसेला मारले नाही कारण ती त्याची सावत्र आई आहे. अशाप्रकारे आपल्या वडिलाची सपत्नी म्हणजेच आपली सावत्रमाता हे जाणून घेऊन त्याने आपल्या वडिलाला खूष केले. ह्या चतुर व कुशल कामामध्ये त्याच्या बुध्दीशक्तीची परिक्षा घेतली गेली व तो त्यात उत्तीर्ण झाला. तो केवळ शक्तीवान नसून युक्तीवान सुध्दा आहे हे त्याने दाखवून दिले.

श्री रामाच्या कामानिमित्त जाणाऱ्या त्या ईश्वराचा अवतार मारुतीरायाला प्रत्येकजण आपल्या परीने शक्य ती मदतसेवा करू लागले. प्रखरपणे तळपणारा सूर्य तोही मंद किरणे पाडून त्याचे श्रम हरण करण्यास मदत करू लागला. व पर्वताच्या शिखरावरून मंद व थंड वारा वाहू लागला.

सर्व लोकांना दिसून आले की हा बाळ छोटा असला तरी सूर्यासारखाच तेजस्वी आहे. सर्वजण आश्चर्य करून म्हणू लागले हा तरुण कोवळा बाळ दुसरा कुणी नसून प्रत्यक्ष रुद्राचाच अवतार असणार. हा दिवसाचो, पहाट व मध्यान्हाची जाणीव

ठेवून आपले अघटीत कार्य करीत आहे.

एकूण ह्या सहा पद्यामध्ये श्रीधरस्वामी महाराज रुद्रावतारी हनुमंताच्या अचाट बुध्दिशक्तीचे वर्णन करतात. ह्या हनुमंताला अफाट देहशक्तीसोबत अमाप बुध्दिचातुर्याची जोड लाभलेली आहे व तो आपल्या बुध्दिचातुर्याने युक्ती लढवून आपल्या वाटेत आलेली विघ्ने मागे सारण्यांत यशस्वी होतो, ह्याचे कौतूक सकळ लोक, सर्व देवता करीत आहे व त्या सर्वांना कळून चुकलेले आहे कि हा हनुमंत म्हणजे प्रत्यक्ष महारूद्रच आहे. हे रुद्ररूप हनुमंताच्या रूपामध्ये प्रगट झाल्याने पृथ्वीवर आलेले संकट, रावणासारखा प्रतापी, दुष्टशक्तीचा संहार करणार ह्या विचाराने निश्चित झालेली आहेत. हा उत्साह ह्या पद्यातून व्यक्त होतो.

श्रीधरस्वामी महाराज बाव्वन्नाव्या पद्यामध्ये मारूती दक्षिण दिशेस असलेल्या लंकेप्रति आकाशमार्गे जात आहे. त्याचे वर्णन करताना ते म्हणतात की आकाशात स्थिर असा दैदिप्यमान सूर्य जसा आहे तसाच पण हा दुसरा प्रकाशमान सूर्य चपळतेने दक्षिण दिशेस चालला आहे. ग्रहांची गति समजून ज्योतीष वर्तविणारे मोठे शास्त्रज्ञ आज ह्या दुस-या सूर्याची गति समजू न शकल्याने बोटे मोजून गणितावर गणित सोडवीत आहेत कि आता पुढे काय होणार.

पुढील पद्यात स्वामी महाराज, म्हणतात कि ह्या महासूर्याची शक्ती मोजणे कठीण आहे. त्याच्या शक्तीसामर्थ्यापुढे प्रत्यक्ष काळ भयाने थरारत आहे. हा रूद्रावतारी हनुमंत दैत्यकुळाचा नाश

करण्यास जात आहे. त्याच्या उड्डाणाने हर्षभरित होऊन सर्वांनी जयजयकार केला. मनाच्या गतिला मागे टाकून तो रूद्र जोराने पुढे गेला.

अशा तऱ्हेने मारुतिराय आकाशमार्गे पुढे जात असता वाटेत राहुची आई सिंहीका जी समुद्रामध्ये वास्तव्य करून होती व जी लंकेच्या रक्षणाचे काम करीत होती, ती त्या वाटेने जाणाऱ्या कुणालाही सहज गिळत होती, तिचे सामर्थ्य एवढे होते कि एखा–द्याची सावली जर तिने गिळली तर तो प्राणी हतबल होऊन तिच्या तोंडात सहज पडत असे. अशा विक्राळ सिंहीकेस पाहून तो मारुतिराय आपला देह विशालकाय करून तिच्या मोठया आ वासलेल्या तोंडातून सहज प्रवेश करून तिच्या जठर कोशात गेला व तिच्या आतडया ओढून बाहेर आला. अर्थात त्याने ती सिंहीका सहज मारून टाकली.

ह्या मारूतिरायाच्या अचाट कार्याने सर्व देवादिकांना मोठे उपकार कार्य झाले. व ते कृतज्ञतेने त्या कपिश्रेष्ठ मारूतिरायावर फुले उधळून जयजयकार करू लागले व म्हणू लागले कि ह्याने एका घोर राक्षसिणीचा सहार केला, जी आजपर्यंत लोकांना फार त्रास देत होती.

असे कार्य केल्यानंतर मारूतिरायाने पुढे उड्डाण केले व सर्व देवाचे सुख होईल व विश्वात धर्म राखला जाईल असे पुढचे कार्य म्हणजे रावणवध करण्यास रामबाणासारखा वेगाने तो पुढे




जाता झाला.

अठ्ठावन्नाव्या पद्यामध्ये श्रीधरस्वामी महाराज मारूतिरायाचे वर्णन अशा शब्दात करतात कि ह्या मारूतिरायाचे ब्रीदच असे आहे कि जगात ज्या दुष्ट प्रवृत्तीमुळे भले लोक कष्टी होतात त्यांची संकटे दूर करणे व जगात सत्प्रवृत्तीच्या लोकांचे रक्षण करून सुधर्म राखला पाहिजे.

असा हा प्रतापी मारूतिराय सिहींकेचा वध करून निमीषातच लंकेच्या पृष्ठभागात येऊन पोहचला जेव्हा तो भूमीवर येऊन आपटला तेव्हा ती भूमी हादरून असा आवाज झाला कि कुणालाही वाटले की आता अंत:काळच आलेला आहे.

## रूद्रशक्तीची जाणीव

बावन्न ते एकोणसाठ पद्यामध्ये मारुतिरायाचे उड्डाण व त्यांचे लंकेत आगमन झाले ह्याचे वर्णन करून श्रीधरस्वामी आपल्या दृष्टीने मारुतिरायातील रूद्रशक्तीचे अवलोकन करीत आहेत. वाल्मिकीने वर्णिलेल्या रामायणाच्या धर्तीवर आपले लिखाण आहे. ते आवर्जुन सांगतात कारण त्यांना निराळे असे काही सांगावयाचे नाही. मूळ रामायणात मारुतिराय हा श्रीरामाचा थोर दास राहिला पण श्रीधरस्वामीनी त्याच्यामध्ये थोर रूद्रशक्ती पाहिली व आम्हास जाणीव करून देतात की रामायणाचे वाचन श्रवण करताना विष्णु अवतार श्री रामाचे कार्य समजून घेताना त्याला आधारभूत रूद्रावतारी श्री मारुतिराय हा जर नसता तर श्रीरामाचे

कार्य अर्थात श्रीविष्णूचे अवतार कार्य अपुरेच राहिले असते व हे रहस्य ते हनुमंताच्या सीताशोध ह्या एकच प्रकरणातून आम्हास जाणून देतात लंकेत प्रवेश केल्यानंतर रावणाशी 'झालेली लढाई व त्यांत रावणवध भाग श्री मारुतिरायाच्या ह्या पूर्व पीठीकेतून साध्य झाला. ईश्वर आणि विष्णूत भेद नसून ते जगातील दुष्ट शक्तीचा संहार करण्याकरिता एकात्मतेने कसे अवतार घेऊन कार्य करतात त्याचे एक धार्मिक विवेचन श्रीधरस्वामींनी ह्या सुंदरकांड' अंतर्गत मारुतिमहात्म्यात विश्लेषण करुन सांगितलेले आहे. हे सत्य जाणून घण्यास श्रीधरस्वामीजींची कृपा आम्हा सर्वांस लाभो अशी श्री चरणाकडे मी प्रार्थना करतो.

श्रीधरस्वामी साठाव्या पद्यामध्ये मारुतिरायाची युक्ती साम-र्थ्याचे वर्णन करतात. जेव्हा मारुतिने लंकेत उडी टाकली व भयकर मोठा आवाज झाला तेव्हा सर्व लंकावासी राक्षसगण तिकडे धावून आले पण मारुतिरायाला लगेच युध्द करावयाचे नव्हते कारण त्याला सीतामाईचा शोध घेणे हा पहिला हेतू होता. त्याकारणाने मारुतिरायाने तात्काळ छोटेसे कपीरुप घेतले. त्या छोटयाशा कपीला त्या राक्षसांच्या रक्षकगणांनी तात्काळ बांधून नेले. ते म्हणतात कि हा लहानसा प्राणी असा दिसतो पण त्याच्या उडीने एवढा मोठा आवाज होईल असे आम्हाला वटत नाही. ते त्याला बांधून लंकेच्या रक्षण करणाऱ्या त्या विक्राळ दाढेच्या राक्षसीणीपाशी नेतात.

तेव्हा तो कपीरुपी हनूमान म्हणतो मी एवढा क्षुल्लक प्राणी.

माझ्यात रक्तही नाही आणि मासही नाही. मला जर तू चिरुन मारशील तर मला काय मिळेल? त्यापेक्षा तू जर मला गिळून टाकशील तर जीभेला रुची येइल.

हे वचन सत्य मानून त्या राक्षसीणीने आपली विक्राळ दाढ आवासून उघडी केली तेव्हा मारुतिरायाने तत्काळ तिच्या तोंडात प्रवेश करुन सरळ तिच्या पोटात गेला व तिच्या आतडचा ओढू लागला. त्यामूळे ती व्यथित होऊन जमिनीवर लोळू लागली. ती राक्षसीण म्हणू लागली कि या माकडास गिळून मी त्रासात पडले. माझ्या पोटात गेलेल्या ह्या वानरास बाहेर काढण्याकरिता मला ओकले पाहिजे म्हणून मला ओकारी काढण्यास काही तरी औषध द्या पण तो हनुमन्त आपले शेपूट तिच्या तोंडावाटून बाहेर काढून तिला नामोहरम करु लागला. हनुमन्ताच्या शेपटीचे टोक बाहेर दिसताच्च तिच्या मदतीला गेलेल्या राक्षसांनी ते शेपूट धरुन त्याला बाहेर ओढू लागले. पण त्या युक्तीवंत मारुतिरायाने तिच्या काळजास घट्ट पकडून ठेवल्याने त्या झटक्यासरशी ते काळीजच तुटून तो तिच्या तोंडावाटे बाहेर आला व ती विक्राळ राक्षसीण मरून पडली. त्याचे हे घोर कृत्य पाहून ते सर्व राक्षस पळून गेले तेव्हा त्या मारुतिरायाने ती बृहन्लंका ओस पाडली व तिकडे असलेल्या एका वृद्ध राक्षसास तो विचारु लागला की मुख्य लंका कोणत्या दिशेस आहे. तेव्हा त्याने सांगितले की ते रत्नाचे कळस दिसतात बघ तीच मुख्य लंका आहे. अशा तऱ्हेने त्याला लंकेचा राजवाडा दृष्टीस पडला.

ह्या पांच पद्यामध्ये श्रीधरस्वामी महाराजांनी मारुतीरायाच्या आणखीन एक युक्ती कार्याचे वर्णन करुन तो कसा बुध्दिवान आहे व आपली कामे शक्तीनेच नव्हे तर युक्तीने कशी साध्य करतो ते दाखवून दिलेले आहे. म्हणूनच रामरक्षास्तोत्रामध्ये मारुतिरा– याचे वर्णन करताना बुध्दिमताय् बरिष्टम असे वर्णन केलेले आहे.

त्या रत्नभरीत सोन्याची शिखरे असलेल्या भव्य राजवाड्याच्या लंकेचा अभिमान गर्व धरुन तो रावण सदा ताठ वागत होता. आपल्याला दहा तोंडे आहेत याचाही त्याला गर्व होता. पण त्याला एकमात्र भय होते ते हेच की तो हेतु त्याला आडवा येत होता. पण ह्या हेतुवर मात करणारी व लंकेचो रक्षण करणारी लंकीनी ही मुख्य होती. जो कोणी त्या लंकीनोला हरवेल तोच लंका जिंकू शकेल असा संकेत होता. तेव्हा त्या मारुतिरायाने आपले लक्ष त्या लंकीनीवर केंद्रीत केले व म्हणाला कि मला सरळ लंका दाखवा मी ती सहज जिंकू शकतो. पण यावेळी ही त्याने आपले बुध्दि– सामर्थ्य वापरुन प्रत्यक्ष युध्द टाळले त्याने सूक्ष्मरुप धारण करुन सर्व लंका हिंडून पाहिली व राक्षसांच्या बळांचा अदमास घेतला. त्याने मनात ठरविले कि या गर्वाने भरलेल्या सर्व राक्ष– सांचा मी नाश करणारच. पण सावकाश तिकडून जवळच जाऊन एका झाडावर बसून सीतामाईच्या स्थानाकडे नजर ठेऊन बसला

तेव्हा त्याला दृष्टीस पडले कि ते अतिशय हटवादी दुष्ट बध्दि– चे राक्षस त्या सीतामाईस पुष्कळ वाईट शब्दांनी त्रास देत आहेत त्यांचे ते मूर्ख कृत्य पाहून त्याला फारच राग आला. पण त्यांच्या

त्या मूर्ख भाषणाने ती सीतामाई काही ढळत नव्हती व मारुति-राय ते सूक्ष्मरुपेच पाहून अजून त्यांना मारण्याचा विचार करत नव्हता.

श्रीधरस्वामी महाराज म्हणतात कि ह्या रुद्रावतारी हनुमानाने जर मनात आणले तर त्याला मेरु पर्वत पालथा घालणे काहीच नव्हे त्याला रावणास मारण्यास क्षणच नको होता. पण तसे तो करण्यास टाळीत होता. कारण त्याला माहित होते कि आपले कार्य फक्त सीताशोध असून रावणवध नव्हे. ते वाल्मिकीने वर्नत्रिलेल्या भविष्याप्रमाणे श्रीरामाच्या हातानेच झाले पाहिजे. हा विचार मनात आणून तो श्रीरामाचा शिष्य शांत झाला.

ह्या रुद्राच्या शक्तीने प्रत्यक्ष काळच भीत आहे व ज्याला हे ब्रम्हांड नाश करण्यास क्षण ही नको, त्याला हे राक्षसगण मार-ण्यास काय समय पाहिजे, असा प्रश्न करुन श्रीधरस्वामी महाराज म्हणतात कि हा वायुपुत्र हनुमान संपूर्ण रुद्राचाच अवतार आहे यात शंका नाही.

अशा तऱ्हेने रुद्राची शक्ती ओळखून त्याचे कार्य आगावूच वर्तवून, रुद्रमहिमा वर्णन करुन आम्हास दिलासा देतात जेव्हा आम्हाला एकदा रुद्राची साक्षपटली की पुढील कार्य सफलच होईल यात शंकाच नको यासाठी आम्ही श्रीशक्तीवर श्रध्दा ठेवावी हे श्रीधरस्वामी पटवून देतात.

आता मारुतिराय सीतामाईची भेट झालेली आहे तिच्या भोवती

पहारा करणारे राक्षसगण त्याने पाहिले. त्यांची ती दुष्कृत्येही पाहिली. तो अजूनही सूक्ष्मकपीरुपाने झाडावरच बसलेला आहे. तिथूनच त्याने अतिमधूर स्वराने श्रीरामाचे स्तवन गाण्यास सुरुवात केली व सीतामाईस शांत करण्याचा प्रयत्न केला व सीतामाईस मधूर वाणीने सुरु झालेल्या गायनाने ते दुष्टबुध्दि राक्षस जरा मोहितच झाले व मारुतिराय आपण कोण व कशासाठी आलो आहो हा संदेश तिला देता झाला.

नंतर तो झाडावरुन उतरुन खाली जमिनीवर आला व अति शांत स्वरुपाने तिला नमस्कार (दंडवत) करता झाला पण सीतामाई साशंकच राहिली कारण गरम दूधाने तोंड भाजल्यानंतर पांढऱ्या थंड ताकाला जशी फुंकर मारतात तशी तिची परिस्थिती झालेली होती तिने जरा भीतभीत त्याला अनेक प्रश्न केले कारण तिला मनाला पटवून घ्यावयाचे होते कि हा वानर खरोखरीच श्रीरामाचा दूत आहे. एकाच हेतूने जवळ आलेली काळीजे एकच होतात व त्यात सरळ व वाकडे विचार त्यांच्या भावना जागवितात म्हणजे परस्पर शंका कुशंका दूर सारुन एकमेकांना जवळ आणतात

त्याप्रमाणे तिचा संशय दूर होऊन हा खरोखर श्रीराम दूतच आहे अशी खात्री पटली व त्या लघु वानरास आपल्या मुलासारखे कुशीत घ्यावे असे तिच्या शुध्द काळजास वाटले पण एकाएकी परकीय कपीबाळास कवटाळणे तिने टाळले आणि तो खरा ब्रम्हचारी कपी हनुमान ज्याला सर्व स्त्रिया आई समान वाटतात तसे त्यावेळी सीतामाईला पाहून त्याच्यात आई पुत्राच्या मायेची

भावना जागृत झाली. आपल्या मनांत जशी भावना असते तशी दुसरी व्यक्ती त्याला त्या विचाराप्रमाणे वाटतात हा अनुभव प्रत्येक स्त्रीस येतो.

येथे श्रीधरस्वामी सीता व हनुमान यांच्या प्रथम भेटीत जो काय त्यांच्या मनाची अवस्था झाली त्याचे वर्णन करतात. आजपर्यंत मारुतिरायाने कुणाही स्त्रीचे तोंड निरखून पाहिले नव्हते असा तो खरा ब्रम्हचारी होता. पण सीतामाईस पाहून त्याच्यात आई मातृप्रेमाची भावना निर्माण झाली व तिलाही त्याला पाहून तिच्यातले मातृवात्सल्य जागे झाले.

तेव्हा शिवस्वरुप मारुतिरायाने सीतामाईला संतोष करण्या–करीता व आपला परिचय देण्याकरिता श्रीरामाची मुद्रा असलेली अंगुठी अति नम्रतेने तिच्या पायाजवळ ठेवली व नमस्कार केला श्रीरामाने ती आपली खूण म्हणून पाठविली होती जी राजमूद्रा होती व श्रीरामाच्या राजरुपाची साक्ष देत होती पण आज मात्र श्रीराम स्वत: वल्कले नेसून वनवासात होता व तीच परिस्थिती सीतामाईची होती.

ती मुद्रा पाहून व मारुतिचे वचन ऐकून सीतामाई खूष झाली व ती मारुतिरायास विनंती करुलागली कि त्याने आता परत जा–वून श्रीरामास घेऊन यावे व आपलो ह्या दुष्ट राक्षसापासून सुटका करावी तिज्या त्या दैन्यस्थितीला पाहून त्याला वाटले कि आपणही किंचीत वानर आहे अशी तिची भावना झालेलो आहे म्हणून तिला धीर देण्याकरिता तो आपल्या योगसामर्थ्याने महानरुप धारण

करिता झाला व सीतामाईस म्हणाला कि चल माझ्या खांद्यावर बस मी तुला घेऊन श्रीरामाच्या भेटीला नेतो. व पुढे म्हणाला कि हे जगन्माते, मला ह्या रावणास मारण्यास काहीच वेळ लागणार नाही. तसाच इतर राक्षसांचा संहार मी सहज करीन. पण सीतामाई मात्र त्याला तशी परवानगी देईनाशी झाली कारण पुढचे कार्य वाल्मिकीने वर्तविलेल्या भविष्याप्रमाणे घडवायचे होते.

त्या बलिष्ट वानरास पाहून ती फारच संतुष्ट झाली व म्हणाली कि लवकर जाऊन श्रीरामास घेऊन ये. ते माझी सुटका करतील. तेव्हा ती आईची आज्ञा समजून एकून तो युक्तीने व शक्तीने समृध्द असलेला हनुमान आपली योजना आखता झाला. त्याने म्हटले कि मी ह्या पुष्कळ राक्षसांचा संहार करीन व हे अशोकवन जाळून टाकीन कारण जर मी निमूटपणे गेलो तर त्याला माझ्या–सारख्या श्रीरामभक्ताचा प्रताप समजणार नाही.

शनिस्वरुप मारुतिरायाने विचार केला कि रावणास काही धडा शिकविला पाहिजे म्हणून तो म्हणाला कि मी भूकेला आहे मला उपाशी जा म्हणू नये. पण ती सीतामाई त्याला म्हणाली कि तसे तू करु नकोस ह्या अशोकवनात पडलेलीच फळे खा.

श्रीधरस्वामी म्हणतात कि तिचा हा गुण तिच्या (सीतामाईच्या) प्रेमळ व कोमल हृदयाची साक्ष देतात. कारण शत्रूच्या बागेची दुर्दशा न करणे व अकस्मात रावणाच्या राक्षसगणांचा संहार करणे तिला योग्य वाटले नाही ते काम श्रीरामावर सोपविले होते

याप्रमाणे सीतामाईची आज्ञा होताच मारुतिरायाने आपल्या

शेपटीने आज्ञा केली कि अमाप फळांनी भरलेली झाडे पालथी घाल त्याकारणाने ती फळे जमिनीवर पडतील. तसे केल्यानंतर त्याने त्या फळांच्या राशी खाण्यास सुरुवात केली.

नंतर मारुतिराय मनांत विचार करु लागला कि या वनास

अशोक असे नाव काय कारणाने दिले असेल? हे वन जर मी नाश केले नाही तर राक्षसास शोक कसा होईल? या वनातील फळे खाऊन राक्षस धष्टपुष्ट होत आहेत म्हणून त्यांचे हे खाद्यच मी नाश करुन त्यांना शोकमयच केले पाहिजे.

त्या राक्षसांच्या पूर्व पुण्याईनेच त्यांना ही शक्ती देणारी फळांची झाडे प्राप्त झालेली आहेत, जणु ही झाडेच त्यांच्या शक्तीरुपाने उभी आहेत पण आता ते पुष्कळ दुष्ट, कृत्ये जरी करीत असतात त्यांना मुळीच मनात शोक नही. म्हणून शिवस्वरुप हनुमानाने विचार केला कि आता त्यांना शोक करण्यासारखे काही कृत्य केलेच पाहिजे व तसा त्याने निश्चय केला.

श्रीधरस्वामी सत्याऐंशीव्या पद्यामध्ये एक सत्य संदेश देतात. ते म्हणतात कि जो कोणी दुसऱ्याचे धन दुसऱ्याची स्त्री हरण करतो हा खराच दुष्टच असतो व तो देहसुख पुष्कळ भोगतो असे आम्हाला वाटते पण हा फक्त आभास होय. कारण तसे दुष्ट कृत्य केल्यानंतर त्याचे पूर्वजन्मीचे किवा पूर्वायुष्यातले पुण्य क्षय पावते व जसा दिवा विझताना मोठा होतो तसे त्याचे सुख ऐश्वर्य किंचीत वृध्दि झाल्यासारखे दिसते.

पण अशा दुष्ट कृत्याने त्याचे पूर्वसंचित पुण्य नष्ट पावते व जेव्हा तो पुण्यविरहीत होतो. तेव्हा त्या काळास आयतीच संधी मिळते व तो त्याच्यावर झडप घालतो. हा रुद्र समस्त विश्वाच्या संहारा करिता नेमलेला आहे. तोच रुद्र आज मारुतिरुपाने दैत्य-कुळाचा संहार करण्यास अवतार घेऊन पुढे उभा ठाकलेला आहे.

तेव्हा मारुतिराय म्हणतात कि रघुकुलाचा श्रेष्ठ श्रीराम जो मुमूक्षुला मोक्ष प्राप्त करुन देतो तो माझा गुरु आहे व सर्व विश्वाची माता म्हणजे सीतामाई माझी गुरुपत्नी आहे. हे दोघे ज्या व्यक्ती-मुळे संकटात पडले. दुःखात पडले त्या व्यक्तीचा नाश करणे माझा धर्म आहे. अशा व्यक्तीला मदत करणारा आता कुणीच उरलेला नाही.

हे राक्षसगण मला शिवशंकराला भजतात व माझ्या कृपा आशिर्वादाने निर्भय बनतात. त्यांना हरविणारा कुणीच नसतो म्हणून ते निश्चित बनतात. पण माझ्या भजनसेवेने पुण्यप्राप्त करुन घेऊन हे नंतर उन्मत बनतात व दुष्ट कृत्ये करु लागतात. म्हणून त्यांना राखणे आता माझे कर्तव्य नाही. त्यांचा नाशच मी केला पाहिजे अशा विचारांनी तो कोपायमान झाला.

पुढील पद्यामध्ये श्रीधरस्वामी महाराज पुनरपी उच्चार करतात कि जो कोणी दुसऱ्याची स्त्री हरण अपहरण करील तर त्याचे संपूर्ण पूर्वसंचित पुण्य लोप झालेच व तो ज्या देवाची सेवा भक्ती करित होता तो देव सुध्दा त्याच्यावर रागावतो. तसेच तो राजा असला तर त्याचे साम्राज्य नाश पावते आणि मुख्य म्हणजे त्याला

जी जगण्यास शक्ती पाहिजे असते ती सुध्दा नष्ट होऊन जाते.

मारुतिराय म्हणतो कि हा राक्षस प्रमुख रावण सीतामाईचे अपहरण करुन दुष्ट कर्म करिता झालेला आहे. हे कृत्य अति किळसवाणे आहे. हे स्मरुन तो फारच क्रोधायमान झाला व ती अशोकवनातील चांगली फळे देणारी झाडे उपटून त्यांची फळे यथेष्ट खाऊ लागला हे कार्य तो श्रीरामाची बाजू घेऊन करु लागला.

हा रुद्र जो विश्वाच्या संकटकाळी प्रलयाग्नी पेटवू शकतो, तो आता थोडासा अग्नी पेटवू लागला म्हणजे झाडांच्या घर्षणाने आग पेटू लागली व त्यायोगे त्या आगीला थोडे खाद्य मिळू लागले कारण आता ती लंका जाळल्याने पुष्कळसे भक्ष्य अग्नीच्या पोटात पडणार होते.

हनुमंताने पाडलेल्या वृक्षांची फळे अगणित व अमाप होती व ती तो अशा तऱ्हेने खात होता कि तो कसा खातो तेच कळत नव्हते. त्याचा खाण्याचा वेग अति अदभूत होता व मधून मधून तो मोठयाने बुभु:कार आरोळी देत होता व विचित्र लीला प्रकार करित होता.

मध्येच वानरांना शोभते तसे डोळे मिचकावून बोटांनी खाजवीत होता. तर मधून मधून तोंड वाकडे करुन दात बाहेर काढून हेळसावीत होता तर मध्येच उडचा मारीत होता. एकूण जी काय मर्कटचेष्टा म्हणतो ती सर्व करुन तो ती फळे भक्षण करित होता

हे त्याचे कृत्य पाहून तिकडील राक्षस फारच रागावले व धावत जाऊन अनेक शस्त्रात्रे घेऊन त्यांच्यावर हल्ला करु लागले पण त्यांचा तो शस्त्रप्रहार म्हणजे जसा पर्वतावर पावसाची वृष्टी होते तसा प्रकार घडून त्याचा किंचीतही परिणाम त्याच्यावर होत नव्हता.

त्यां शस्त्रांत्रांचा मार म्हणजे जणु काय फुलांच्या राशी घेऊन कुणास मारावे तसे मारुतिरायाला घडत होते त्याच्यावर त्यांचा अजिबात परिणाम होत नव्हता. कुणाच्या बाणांचे मार किंवा तलवारीचे घाव त्याला कांहीच लागत नव्हते. तो (मारुतीराय) तर आपले डोळे मिचकावून फळे खात होता, व कुणासही ढुंकुन– सुध्दापह्यात नव्हता.

याप्रमाणे मारुतिरायाने सर्व फळांच्या राशी खाऊन फस्त केल्या आणि आपली उदरशांति झाल्याचं सुचविण्यास म्हणा पोटावरुन हात फिरविला आणि ढंकर दिला. आता आपल्या भुकेचे शमन झाल्याचे त्याने मान्य केले आता आपल्याबरोबर असलेल्या रक्षो– गणांच्या पोटाचा (भुकेचा) तो विचार करु लागला.

लंकेस उडाण करताना मारुतिरायाचे सोबत अनेक कपीश्रेष्ट होते हे मागे एकोणीसाव्या पद्यामध्ये सुचविलेले आहे. ते सर्व गुप्त रुपाने होते. ते रुद्रगण आता प्रगट होऊन त्याला नम्रतेंने विनवू लागले कि पुष्कळ दिवस झाले आम्ही उपाशी आहोत. आज आम्हला खाण्यास भरपूर मिळणार अशी आशा वाटते.

पण ह्या भूतपंक्ती शाकाहारी नव्हत्या. त्यांना त्या दुष्ट राक्षसाचे मास खाऊन ते गरम गरम रक्त पिण्याची आशा झाली. म्हणून मारुतिरायाने त्या राक्षसाना मारुन आपल्या भूत पंक्तीला खाऊ दिले. त्यांना ही रुचकर जेवणाची संधी श्रीरामाच्या कृपेने हनुमंताच्या कृत्याने प्राप्त झाली. अशातऱ्हेने त्या भूतपंक्ती आता राक्षसांचा फडशा पाडीत येथेच्छ भोजन करुन मारुतिरायाची व तात्पर्याने श्रीरामाची करुणा आठवू लागल्या.

याप्रमाणे रुद्राची आपल्या रक्षोगणांसमवेत दैहिक बाजूचे विवेचन श्रीधरस्वामींनी शंभराव्या पद्यात करुन आम्हाला या लिंग देहाचे महत्व समाजावून दिलेले आहे. पण ह्या भूतपंक्ती अदृश्य रुपाने वावरत होत्या असे दिसते कारण त्यांची विनंति मारुतिरायास आहे की तू समुद्राप्रमाणे बळिष्ट आहेस तूच या दुष्ट राक्षसांना मार, तुझ्या पायाकडे आम्ही नमून प्रार्थना करतो, आम्हाला कधी ह्या राक्षसांचे मांस खाऊ, रक्त पिवू व कधी त्यांच्या आतडयाची माळ आमच्या गळयाभोवती घालू असे झालेले आहे.

अशी त्यांची नम्र प्रार्थना ऐकून त्या हनुमंताने त्यांना आस्वासन दिले कि आता क्षणांत मी त्या राक्षसांचा संहार करतो. तेव्हा ते शिवगण ईस्वररुपी मारुतिरायाची स्तुती करु लागले.

नंतर वीर हनुमान राक्षसांचा सांहार करु लागला. त्या तुमुळ संहार युध्दाने ते राक्षसांचे गण ज्या जमिनीवर काळचा ढगासारखे

आच्छादून होते व देवदिकांना त्रास देत होते ते आता सोसा–टयाच्या वाऱ्याने जसे ढग वितळतात तसे मारुतिरायाच्या संहाराने नष्ट पाऊ लागले व हे पाहून बंदिस्त अशा अनेक देवाना फार आनंद जाता झाला.

आता मारुतिरायाला आणखीन एक युक्ती सुचली. त्याला आपल्या शेपटीची शक्ती जाणवू लागली. त्याने आपल्या शेपटीचे चुंबन घेतले व म्हटले कि तू आता माझ्या ह्या महान कार्यामध्ये मदत कर अर्थात ह्या दुष्ट राक्षसांचा सहार करण्याच्या कार्यात

मग मारुतिराय आपल्या शेपटीने त्या राक्षसांवर प्रहार करु लागला व त्यामुळे ते सैरावैरा पळू लागले पण त्यांना तो आपल्या शेपटीन आवळीत होता. अशा तऱ्हेनें तिकडे असलेल्या सुमारे चौदाहजार राक्षसांना शेपटीने पिळून बांधून त्यांना जवळच्या समुद्रात फेकता झाला.

हे त्याचे भयंकर कृत्य पाहून रावणानं त्याच्यावर ऐंशीहजार राक्षसवीर पाठविले जे फार शक्तीवान होतेच तसेच लढण्यात निपुण होते व धीट होते पण मारुतिरायाने त्यांना अपल्या शेपटीने मारुन ठार केले तर त्येिकांना त्यांच्या डोक्यावर जवळ असलेल्या डोंगराचे कडे उचलून फेकून यमसदनास पाठविले.

तेव्हा रावणाने मारुतिरायावर जंबुमाळी हा महाप्रतापी योध्दा चाल करुन पाठविला. तो मोठयाने गर्जत बाणांचा पाऊस झोडीत पुढे येऊ लागला. पण त्याच्या सैन्याला सुध्दा मोठेमोठे दगड फेकून

मारुतिरायाने मारले व इतरांना शेपटीने ठार केले.

हे पाहून रावण मनाने फार खचला व आपल्या मंत्रीपुत्रास मारुतिवर चाल करुन जाण्यास आज्ञाकरिता झाला पण मारुति-रायाने त्याच्याबर असा मुष्टीचा प्रहार केला व त्याचे पोट आपल्या तीक्ष्ण नखांनी फाडून टाकले.

तेव्हा रावणाने त्यांच्यावर पांच शूर प्रमुख सेनापती धाडले पण तेही व्यर्थ गेले. त्यांच्या पुत्रासह त्यांना मरणच आल हे पाहून रावणाने अतिदु:खाने आपल्या पुत्राला म्हणजे इंद्रजिताला त्याच्या बर चाल करुन पाठविले.

हा इंद्रजित कपटयुघ्द खेळण्यांत फार पटाईत होता पण मारुतिरायापुढे त्याचा डाव चालला नाही. उलट मारुतिरायाचे शेपूटच इंद्रजीताच्यामागे लागले तेव्हा तो भयाने इतस्तत: पळू लागला. त्याने चालविलेले शस्त्र अस्त्र प्रयोगही वायां गेले.

तेव्हा तो धैर्यानेच पळत जाऊन लपण्याचा प्रयत्न करु लागला. मारुतिरायाने आपले शेपुट जरा आवरुन घेतले त्याने विचार कला की या दुप्टाला मारण्यास मला मुळीच क्षण नको पण ह्याने जे ब्रम्हास्त्र वापरलेले आहे ते खोटे ठरु नये म्हणून मी जरा हरल्या सारखे करुन घेतो. ही सुध्दा मारुतिरायाची एक युक्ति होती. कारण त्याला आपला जरा प्रताप दाखवायचा होता. लंका जाळणं त्याचा हेतु होता. पण इंद्रजिताला समजले नाही कि हा हनुमंत आपल्या ब्रम्हपाशांत जो सापडला आहे तो आपला नाशकरण्या साठीच.






मग रावण तिकडे आला व फारच [illegible] तलवारीचे वार करु लागला पण मारुतिराय म्हणू लागला की हा फार अति नाजुक व क्षुल्लक असा आहे हे उपहासाचे भाषण रावणास टोमण्याचे होते.

मारुतिराय रावणास म्हणाला कि तुझ्या नाशाकरिता तो श्रीराम स्वतःच येत आहे. त्याचा मी सेवक आहे मला कोणतेच विकार बाधंत नाहीत. माझ्यावर कोणतेच शस्त्र वा अस्त्र तसेच कपट चालत नाही. इतकेच नव्हे तर मला मरण सुध्दा येणार नाही. तुझ्यासारख्या दुष्टाला मारणे हे काम मला मोपे आहे. पण ते मी करीत नाही.

तेव्हा रावणाला वाटले कि जर हा बळिष्ट वानर मारला पाहिजे तर याचे शेपूट जाळले पाहिजे. व तसे ते सर्वजण प्रयत्न करु लागल. ते शेपूट जाळण्यासाठी त्यांनी घरच्या स्त्रीयांच्या नेसणाऱ्या साडया, व कपडे घरगुती तुपात भिजवून आणले व त्याच्या शेपटीला गुंडाळून आग लावून दिली.

ती आग भडकून ज्वाला पसरु लागल्या व त्या अशोकवनाच्या बाजूने जाऊ लागल्या. तेव्हा तिकडे सीतामाई आहे असे त्याच्या कानावर आले तेव्हा त्याने आपले शेपुट आवरुन घेतले. तेव्हा रावणाला वाटले की अशोकवनासही आग लावावी, म्हणून तो स्वतः येऊन फुंकर घालू लागला पण भडका उडून त्याचेच तोंड जाळले

श्रीधरस्वामी म्हणतात कि वारा व विस्तव ही दोघे भावंडे

असल्याने वाऱ्याचा पुत्र तो रुद्रावतारी मारुति हा काळरुपेच उभा ठाकला आहे. हा काळ आता सर्व देवगणांच्या मदतीस आलेला असून राक्षसांचा अंतःकाळ ठरणारा हा काळ रुद्राशिवाय दूसरा कोण असू शकेल ? अशा तऱ्हेने अग्नी व वायूंनी देवतांस अप्रत्यक्ष-रुपे सहाय्य केले हे त्या राणाच्या लक्षात नाही. कारण वायु हा रावणाचा मित्र होता.

अशातऱ्हेने पुष्कळ असा लंकेचा भाग जाळून अशुध्द झालेल्या लंकेला शुध्द करुन आपला देहही ह्या दुष्टाच्या संसर्गाने अशुध्द झाल्याचे जाणून आपला तो अशुध्द देह त्याने अग्नोत विसर्जन केले व सोन्यासारखा कांतिचा देह तो धारण करता झाला.

त्या धडधड जाळणाऱ्या ज्वाळा आकाशास भिडत होत्या व वाटत होते कि सर्व लंकेचे विश्वच तो जाळून टाकणार, पण तितक्यात त्याने तो अग्नी शांत करण्याकरिता समुद्रात उडी घेऊन ते जळणारे शेपुट विझविले.

नंतर तो हनुमंत अशोकवनाकडे येऊन सीतामाईस नमन करिता झाला व त्याने तिच्या हातात ब्रम्हपत्र दिले व पश्चात आपल्या सर्व वानरगणांना भेटला. तेव्हा सर्वत्र जयजयकार होऊन तो जयघोष आकाशभर दुमदुमुन गेला.

लंकेहून परत उड्डाण करुन हनुमंत श्रीरामापांशी आला व ब्रम्हपत्र त्याच्या चरणी अर्पण केले. व तेव्हा सर्वांना फारच आनंदी आनंद झाला अशा तऱ्हेने हनुमंताने लंकादहन केलेली कथा श्रीधरस्वामी महाराजांनी पद्यरुपाने वर्णन केलेली आहे. ते म्हणतात

कि आपण वानरकुलातील श्रेष्ठ अशा ह्या मारुतिरायाची अगाध दिव्यलीला वर्णन केलेली आहे. हे पद्यरुपी चरित्र जो भक्तीभावाने ऐकतो व पाठांतर करतो तर त्याची सर्व दुःखे नाश पावतील व त्यांना आनंदी आनंदच मिळेल

ह्या प्रमाणे एकशेएकवीस पद्यात श्रीधरस्वामी महाराजांनी वाल्मिकीरामायणातील सुंदर कांडांतर्गत जे श्री मारुतिमाहात्म्य आहे त मराठी भाषेत सुरस वर्णन केलेले आहे.

ह्यांत श्रीधरस्वामींनी आपल्या दिव्य अंतरदृष्टीने काही प्रसंग तपशीलवार वर्णन केलेले आहेत. तर कित्येक प्रसंगातून त्यांनी आम्हाला तत्वज्ञानपर बोध करण्याचा प्रयत्न केलेला आहे हे तत्वज्ञान त्यांच्या स्वानुभवातून उद्‌भवलेले आहेत. कारण रुद्र–शक्तीचे वर्णन करताना श्री मारुतिरायाचा अवतार हा प्रमाणभूत ठरवून हरी व हर यांचे ऐक्य साधणारे गहन तत्व त्यांनी प्रसंगातून पटवून दिलेले आहे. इकडे ब्रम्हाचे महत्व पटविलेले आहे रुद्र हा ब्रम्हास खोटा ठरवू न देण्याकरिता पाशांत सापडतो विष्णुस मदत करण्यास सेवकरुपाने जन्म घेतो व रामायणाचे भाकित वाल्मिकीने वर्तविलेल्या भविष्याप्रमाणेच करण्यास पूर्व संकेताने वागतो वगैरे जिज्ञासा जागृत करणारे प्रसंग होय या पारमार्थिक कार्यावरुन आपण बोध घेऊन श्रीधरस्वामी कृपेने आमचे आयुष्य सफल व समृध्द बनवूया.

॥ श्रीराम जयराम जयजयराम ॥

# शुध्दि-पत्रक

| ओळ | चूक | ठीक |
|---|---|---|
| ४ | १९४२ | १९५२ |
| १७ | रामाचाही | रामाचाही |
| ११ | विश्वासू | विश्वास |
| ४ | अचांट | अचाट |
| ११ | देशाभिमानी | देहाभिमानी |
| १२ | त्याला | त्याची |
| १० | पातळांत | पाताळांत |
| २ | गुणवान | गुणगान |
| ७ | धार्मिक | मार्मिक |
| २ | मला काय | तुला काय |
| ६ | ओदु | ओढू |
| २० | तिज्या | तिच्या |
| ९ | एकून | एकूण |
| १४ | शनिसरुप | शिवस्वरुप |
| १ | शेपटीने | शेपटीला |
| १२ | नही | नाही |
| २१ | सांहार | संहार |
| १७ | अपल्या | आपल्या |
| १८ | त्यिेकाना | कित्येकाना |
| ३ | फार | वार |
| ५ | राणाच्या | रावणाच्या |
| १० | केले | केला |

